# शेतकरी जनता अपघात विमा योजना २०१०-११

**महाराष्ट्र शासन**
कृषि,पशुसंवर्धन,दुग्धव्यवसाय विकास व मत्स्यव्यवसाय विभाग,
शासन निर्णय क्रमांक - शेअवि-२०१०/प्र.क्र.१७२/११-अे,
मंत्रालय विस्तार, मुंबई ४०००३२
**दिनांक - १० ऑगस्ट, २०१०**

**वाचा:-** १) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११-अे, दि. १९ऑगस्ट,२००४
२) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११-अे, दि. ५जानेवारी,२००५
३) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. एनएआयएस १२०४/प्र.क्र.१६६/११-अे, दि. ३१मार्च,२००५
४) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००७/प्र.क्र.२३२/११-अे, दि. १३जुलै,२००७
५) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००९/प्र.क्र.२६८/११-अे, दि. १२ऑगस्ट,२००९
६) शासन निर्णय, कृषि व पदुम विभाग क्र. शेअवि-२००९/प्र.क्र.२६८/११-अे, दि.४डिसेंबर,२००९
७) शासन पत्र क्र.शेअवि-२०१०/प्र.क्र.१७२/११-अे, दि.२७ जुलै,२०१०
८) शासन पृष्ठांकन क्र.शेअवि-२०१०/प्र.क्र.१७२/११-अे, दि.१० ऑगस्ट,२०१०

**प्रस्तावना :-**

शेती व्यवसाय करताना होणारे अपघात, वीज पडणे, पूर, सर्पदंश, विंचूदंश, विजेचा शॉक बसणे इ. नैसर्गिक आपत्तीमुळे होणारे अपघात, रस्त्यावरील अपघात, वाहन अपघात तसेच अन्य कोणत्याही कारणांमुळे होणारे अपघात यामुळे बऱ्याच शेतकऱ्यांचा मृत्यू ओढावतो किंवा काहींना अपंगत्व येते. घरातील कर्त्या व्यक्तिस झालेल्या अपघातामुळे कुटुंबाचे उत्पन्नाचे साधन बंद होवून अडचणीची परिस्थिती निर्माण होते. अशा अपघातग्रस्त शेतकऱ्यांस/त्यांच्या कुटुंबास आर्थिक लाभ देण्याकरिता कोणतीही स्वतंत्र विमा योजना नसल्यामुळे शासनाने संदर्भ क्र. १ व २ येथील शासन निर्णयान्वये शेतकरी व्यक्तिगत अपघात विमा योजना कार्यान्वित केलेली आहे. सन २००९-१० पासून सदर योजनेचे नाव बदलून त्याऐवजी **शेतकरी जनता अपघात विमा योजना** असे नामाभिधान करण्यात आले आहे.

सदर योजनेचे कल्याणकारी स्वरुप विचारात घेऊन ही योजना पुढे सन २०१०-११ मध्ये चालू ठेवण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

राज्यात **शेतकरी जनता अपघात विमा योजना** सन २०१०-११ मध्ये दि.१५ऑगस्ट,२०१० ते दि.१४ऑगस्ट,२०११ या एक वर्षाच्या कालावधीकरिता चालू ठेवण्यास या शासन निर्णयान्वये मान्यता देण्यात येत आहे.

२. या योजनेचा फायदा राज्यातील नोंदणीकृत अपघातग्रस्त शेतकऱ्यांना देण्यात येतो. सन २०००-०१ च्या कृषि गणनेच्या शेतकरी संख्येचा सरासरी वृद्धीदर विचारात घेऊन सुमारे १,३७,००,००० इतकी शेतकरी संख्या निश्चित करण्यात आली आहे. सदर शेतकरी संख्या सन २०१०-११ ते सन २०१२-१३ या तीन वर्षांच्या कालावधीसाठी ग्राह्य धरण्यात येत आहे. त्यानुसार, प्रस्तावनेत नमूद कारणांमुळे होणारे अपघाती मृत्यू व अपंगत्व यासाठी राज्यातील महसूल विभागाकडील ७/१२ नोंदीप्रमाणे १० ते ७५ वर्षे वयोगटातील खातेदार शेतकऱ्यांच्यावतीने, योजनेच्या मंजूर कालावधीकरिता, सदर शासन निर्णयाव्दारे विमा पॉलिसी उतरविण्यात येत आहे.

३. योजना कालावधीत संपूर्ण दिवसासाठी म्हणजेच विहित कालावधीतील प्रत्येक दिवसाच्या २४ तासांसाठी ही योजना लागू राहील. या कालावधीत शेतकऱ्याला केव्हाही अपघात झाला किंवा अपंगत्व आले तरी तो या योजनेंतर्गत लाभासाठी पात्र राहील.

४. या योजनेंतर्गत शेतकऱ्यांनी किंवा त्यांच्यावतीने अन्य कोणत्याही संस्थेने विमा कंपन्यांकडे स्वतंत्ररित्या विमा हप्त्याची रक्कम भरण्याची गरज नाही तसेच यापूर्वी शेतकऱ्यांनी अथवा त्यांच्यावतीने अन्य कोणत्याही संस्थेने कोणतीही वेगळी विमा योजना लागू केली असल्यास अथवा विमा उतरविला असल्यास त्याचा या योजनेशी काहीही संबंध असणार नाही. या योजनेंतर्गत मिळणारे लाभ स्वतंत्र असतील.

**(कृ.मा.प.)**

५.	उपरोक्त क्र.४ येथील दि. १३जुलै,२००७ च्या शासन निर्णयान्वये मा.प्रधान सचिव (कृषि) यांच्या अध्यक्षतेखाली विमा हप्ता दर व विमा कंपन्यांची नियुक्ती करण्यासाठी गठीत समितीची बैठक दि.०४ऑगस्ट,२०१० रोजी संपन्न झाली. सदर बैठकीमध्ये सन २०१०-११ ते सन २०१२-१३ या तीन वर्षांच्या कालावधीसाठी प्रति शेतकरी प्रति वर्ष रु.१४/- विमा हप्ता दर निश्चित करण्यात आला आहे.

६.	सन २०१०-११ मध्ये दि.१५ऑगस्ट,२०१० ते दि.१४ऑगस्ट,२०११ या कालावधीकरिता राज्यातील सर्व नोंदणीकृत शेतकऱ्यांना अपघातांपासून संरक्षण देण्यासाठी विमा सल्लागार कंपन्या, विमा कंपन्या, त्यांचेकडे सोपविण्यात आलेले विभाग, विमा संरक्षित शेतकरी संख्या व विमा कंपन्यांना अदा करावयाची विमा हप्ता रक्कम इ. खालील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे निश्चित करण्यात येत आहे. सदर प्रयोजनार्थ विमा सल्लागार कंपन्या व विमा कंपन्या यांची नियुक्ती सन २०१०-११ या एक वर्षाच्या कालावधीसाठी करण्यात येत आहे. या विमा सल्लागार कंपन्यांना शासनाच्यावतीने कोणतेही शुल्क अदा करण्यात येणार नाही. खालील तक्त्यात नमूद केल्याप्रमाणे एकूण विमा हप्ता रक्कम रु.१९१८.०० लाख (रू.एकोणीस कोटी अठरा लाख फक्त) याव्दारे मंजूर करुन वितरित करण्यास मान्यता देण्यात येत आहे.

| विमा सल्लागार कंपनी | विमा कंपनीचे नाव | सोपविण्यात आलेला विभाग | शेतकरी संख्या (लाख) | विमा हप्ता रक्कम (रुपये लाखात) |
|---|---|---|---|---|
| कबाल इन्शुरन्स ब्रोकींग सर्व्हिसेस प्रा. लि., मित्तल टॉवर्स, ११८-बी विंग, ११वा मजला, नरिमन पॉईंट, मुंबई-२१ | युनायटेड इंडिया इन्शुरन्स कंपनी लि., प्रादेशिक कार्यालय नागपूर, अंबिका भवन, क्र. १९, ३ रा मजला, धरमपेठ एक्स्टेंशन, शंकर नगर, नागपूर-४४० ०१० | अमरावती, नागपूर | २८.९० | ४०४.६० |
| | फ्युचर जनरली इंडिया इन्शुरन्स कंपनी लि., डीजीपी हाऊस, पहिला मजला,८८-सी, जुना प्रभादेवी मार्ग, प्रभादेवी, मुंबई-४०० ०२५ | कोकण, पुणे | ४८.९५ | ६८५.३० |
| | दि न्यू इंडिया ॲश्युरन्स कं. लि., मंडल कार्यालय १३०८००, १७/अे, सातवा मजला, कुपरेज रोड, न्यू इंडिया सेंटर, मुंबई- ४०० ०३९ | नाशिक | २५.९० | ३६२.६० |
| डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि., एल स्क्वेअर, ऑफिस नं.१३, तिसरा मजला, सांघवी नगर, परिहार चौक, औंध, पुणे- ४११ ००७ | दि न्यू इंडिया ॲश्युरन्स कं. लि., मंडल कार्यालय १५३४००, पहिला मजला, स्वातंत्र्यवीर सावरकर उद्योग भवन, शिवाजीनगर, पुणे-४११ ००५ | औरंगाबाद | ३३.२५ | ४६५.५० |
| **एकूण** | | | **१३७.००** | **१९१८.००** |

७.	विमा प्रस्ताव विहित कागदपत्रांसह ज्या दिनांकास तालुका कृषि अधिकारी यांचे कार्यालयात दाखल/प्राप्त होईल, त्या दिनांकासच तो विमा कंपनीस प्राप्त झालेला आहे असे समजण्यात येईल.

८.	विमा प्रस्ताव विहित कागदपत्रांसह योजनेच्या कालावधीत कधीही प्राप्त झाला तरी तो विचारात घेणे तसेच योजनेच्या अखेरच्या दिवसात झालेल्या अपघातांसाठी योजनेचा चालू वर्षाचा मंजूर कालावधी संपल्यानंतर ९० दिवसांपर्यंत तालुका कृषि अधिकाऱ्यांकडे प्राप्त झालेले प्रस्ताव स्विकारणे विमा कंपनीवर बंधनकारक राहील तसेच समर्थनीय कारणांसह ९० दिवसांनंतर प्राप्त होणारे विमा प्रस्ताव विमा कंपनीने स्विकारावेत. प्रस्ताव विहित मुदतीत सादर केले नाहीत या कारणास्तव विमा कंपन्यांना प्रस्ताव नाकारता येणार नाहीत.

९.	विमा कंपन्यांना सुस्पष्ट कारणांशिवाय विमा प्रस्ताव नाकारता येणार नाहीत. विमा कंपन्यांनी नामंजूर विमा दाव्याप्रकरणी सुस्पष्ट कारणमिमांसा संबंधित शेतकऱ्यांना कटाक्षाने मराठी भाषेतच कळवावी व त्याची प्रत विमा सल्लागार कंपनी / आयुक्त (कृषि) / संबंधित विभागीय कृषि सहसंचालक / जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / तालुका कृषि अधिकारी यांच्याकडे न चुकता पाठवावी.

१०.	विमा सल्लागार कंपनीने त्यांच्याकडे प्राप्त होणारे प्रस्ताव व्यवस्थितरीत्या / पूर्णतः तपासावेत व परिपूर्ण प्रस्ताव संबंधित विमा कंपनीकडे मान्यतेसाठी सादर करावेत. विमा सल्लागार कंपनीने विमा कंपनीकडे पाठविलेले प्रस्ताव मंजूर करुन घेण्याची संपूर्ण जबाबदारी विमा सल्लागार कंपनीची राहील. विमा दावा विमा कंपनीकडे सादर झाल्यापासून त्यावर ६० दिवसांच्या आत कार्यवाही करणे विमा कंपनीवर बंधनकारक राहील. याउपरही विमा कंपनीने प्रस्ताव नाकारल्यास, आवश्यक कागदपत्रांची पूर्तता झालेल्या प्रकरणी संबंधितांनी विमा सल्लागार कंपनीशी संपर्क साधल्यास, विमा सल्लागार कंपनीने शेतकऱ्यांच्यावतीने इर्डा ग्राहक तक्रार कक्ष / विमा न्यायाधीश / जिल्हा ग्राहक तक्रार निवारण मंच / राज्य ग्राहक तक्रार निवारण आयोग / न्यायालय येथे दावे दाखल करणे आवश्यक राहील. अशा प्रकरणी येणाऱ्या खर्चाची प्रतिपूर्ती शासनाकडून अथवा शेतकऱ्यांकडून/ दावेदारांकडून करण्यात येणार नाही.

११.	विमा सल्लागार कंपन्यांनी जिल्ह्यातील प्रलंबित प्रकरणांची यादी व मासिक प्रगती अहवाल आयुक्त (कृषि) / विभागीय कृषि सहसंचालक / संबंधित जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / तालुका कृषि अधिकारी यांचेकडे दरमहा पाठवावी. अपुऱ्या कागदपत्रांमुळे प्रलंबित राहिलेल्या / नाकारलेल्या प्रस्तावांप्रकरणी आवश्यक कागदपत्रांची पूर्तता करण्याची जबाबदारी विभागीय कृषि सहसंचालक / जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी / तालुका कृषि अधिकारी यांची राहील.

१२.	सन २०१०-११ मध्ये शेतकरी जनता अपघात विमा योजनेसंबंधी शासनाचेवतीने आयुक्त कृषि तसेच विमा सल्लागार कंपन्या व विमा कंपन्या यांचेमध्ये या शासन निर्णयातील अटी/शर्ती व मान्यतेनुसार त्रिपक्षीय करार (Tripartite Agreement) करुन त्यानुसार योजना अंमलात आणली जाईल. **सदर त्रिपक्षीय करार योजनेच्या सुरुवातीसच करणे अनिवार्य राहील.** शासन व विमा कंपन्यांमध्ये झालेल्या पॉलिसी करारातील तरतूदी, उपरोक्त क्र.५ येथील दि.०४डिसेंबर,२००९ च्या शासन निर्णयाव्दारे विहित केलेल्या अटी व शर्ती तसेच भविष्यात लागू करण्यात येणाऱ्या अटी व शर्ती तसेच मार्गदर्शक सुचनांनुसार विमा दावे मंजूर करणे तसेच विमा प्रस्तावांसंदर्भातील कार्यपध्दती, सादर करावयाच्या आवश्यक कागदपत्रांबाबतचा तपशिल व नमुने इ. बाबी विमा कंपनीवर बंधनकारक राहतील.

१३.	यावरील खर्च "मागणी क्रमांक डी-३, २४०१-पीक संवर्धन, ११०- पीक विमा, (००) (०६) शेतकऱ्यांसाठी वैयक्तिक अपघात विमा योजना (२४०१ ४४२७), राज्य योजना, ३३- अर्थसहाय्य" या लेखाशिर्षाखाली सन २०१०-११ करिता मंजूर अर्थसंकल्पीय तरतूदीतून भागविण्यात यावा.

१४.	सदर प्रयोजनासाठी सहाय्यक संचालक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे- १ यांना आहरण व संवितरण अधिकारी म्हणून घोषित करण्यात येत आहे. सदर रक्कम कोषागारातून काढून रेखांकित धनादेश/दर्शनी धनाकर्षाव्दारे परिच्छेद क्र.६ येथील तक्त्यात दर्शविल्याप्रमाणे विमा कंपन्यांना अदा करण्यात यावी.

१५.	सदर शासन निर्णय नियोजन व वित्त विभागाच्या सहमतीने व त्यांच्या अनुक्रमे अनौपचारिक संदर्भ क्र.१७६/१४३१, दि.६ऑगस्ट,२०१० व क्र.१६४/१०/व्यय-१, दि.९ऑगस्ट,२०१० अन्वये निर्गमित करण्यांत येत आहे.

१६.	सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक २०१००८१०१६१४५६००१ असा आहे.

**महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने**

**(ब. दि. उमाटे )**

**अवर सचिव, महाराष्ट्र शासन**

प्रति,

१) मा.राज्यपाल यांचे सचिव
२) मा.मुख्यमंत्री यांचे प्रधान सचिव
३) मा.उपमुख्यमंत्री यांचे सचिव
४) मा.मंत्री (कृषि व जलसंधारण) यांचे खाजगी सचिव
५) सर्व मंत्री / राज्यमंत्री यांचे खाजगी सचिव

**(कृ.मा.प.)**

६) मा. मुख्य सचिव यांचे स्वीय सहाय्यक
७) अपर मुख्य सचिव (महसूल ), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
८) प्रधान सचिव (नियोजन), नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
९) प्रधान सचिव (वित्त), वित्त विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१०) प्रधान सचिव (अ. व सु.), गृह विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
११) प्रधान सचिव (मदत व पुनर्वसन), महसूल व वन विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
१२) सर्व विभागीय महसूल आयुक्त
१३) सचिव, कृषि मंत्रालय, भारत सरकार, (कृषि व सहकार विभाग ), कृषि भवन, नवी दिल्ली
१४) सचिव, वित्त मंत्रालय, भारत सरकार (वित्त विभाग) (विमा), नवी दिल्ली
१५) आयुक्त (कृषि), कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे
१६) महालेखापाल, महाराष्ट्र-१/२, (लेखा परिक्षा / लेखा व अनुज्ञेयता), मुंबई / नागपूर
१७) अधिदान व लेखाधिकारी, मुंबई
१८) संचालक, लेखा व कोषागारे, मुंबई
१९) जिल्हा कोषागार अधिकारी, पुणे
२०) अध्यक्ष, कबाल इन्शुरन्स ब्रोकींग सर्व्हिसेस प्रा. लि., मित्तल टॉवर्स, ११८-बी बिंग, ११ वा मजला, नरीमन पॉईंट, मुंबई-४०० ०२१
२१) कार्यकारी संचालक, डेक्कन इन्शुरन्स व रिइन्शुरन्स ब्रोकर्स प्रा.लि., एल स्क्वेअर, ऑफिस नं.१३, तिसरा मजला, सांघवी नगर, परिहार चौक, औंध, पुणे- ४११ ००७
२२) युनायटेड इंडिया इन्शुरन्स कंपनी लि., प्रादेशिक कार्यालय नागपूर, अंबिका भवन, क्र. १९, ३ रा मजला, धरमपेठ एक्स्टेंशन, शंकर नगर, नागपूर-४४० ०१०
२३) फ्युचर जनरली इंडिया इन्शुरन्स कंपनी लि., डीजीपी हाऊस, पहिला मजला,८८-सी, जुना प्रभादेवी मार्ग, प्रभादेवी, मुंबई-४०० ०२५
२४) दि न्यू इंडिया ॲश्युरन्स कं. लि., मंडल कार्या.१३०८००, १७/अे, सातवा मजला, कुपरेज रोड, न्यू इंडिया सेंटर, मुंबई- ४०० ०३९
२५) दि न्यू इंडिया ॲश्युरन्स कं. लि., मंडल कार्या.१५३४००, पहिला मजला, स्वातंत्र्यवीर सावरकर उद्योग भवन, शिवाजीनगर, पुणे-४११ ००५
२६) विमा संचालक, म्हाडा इमारत, १ ला मजला, बांद्रा (पूर्व), मुंबई
२७) महासंचालक, माहिती व जनसंपर्क संचालनालय, मंत्रालय, मुंबई (५ प्रती)
२८) ग्रंथालय, महाराष्ट्र विधानमंडळ सचिवालय, विधानभवन, मुंबई (५ प्रती)
२९) मुख्य सांख्यिक, कृषि आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, पुणे-१
३०) सर्व जिल्हाधिकारी
३१) सर्व तहसिलदार
३२) सर्व कृषि संचालक
३३) सर्व विभागीय कृषि सह संचालक
३४) सर्व जिल्हा अधिक्षक कृषि अधिकारी
३५) सर्व तालुका कृषि अधिकारी
३६) सर्व सहसचिव / उपसचिव /अवर सचिव / कक्ष अधिकारी, कृषि व पदुम विभाग, मंत्रालय, मुंबई-३२
३७) सर्व मंत्रालयीन विभाग
३८) निवड नस्ती, का. ११-अे